**पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पामधील राज्यशासनाचे दुय्यम कर्ज सहाय्य महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१८/प्र.क्र.११५(४)/नवि-७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ जानेवारी, २०१९

__संदर्भ :__

१. नगर विकास विभाग शासन निर्णय, क्र पीएमआर-३३१३/प्र.क्र.२९/नवि-७, दि. २९.१०.२०१३
२. नगर विकास विभाग शासन निर्णय, क्र. पीएमआर-३३१६/प्र.क्र.१३२/नवि-७, दि. २३.१२. २०१६
३. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. एमआरडी-३३१७/प्र.क्र.१०५/नवि-७ दिनांक २८ मार्च,२०१८
४. वित्त विभाग परिपत्रक क्रमांक अर्थसं.२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८
५. नगर विकास विभाग परिपत्रक क्रमांक बीयुडी-.२०१८/प्र.क्र.५५/नवि-४, दिनांक ०३ एप्रिल, २०१८
६. वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक पुरक-२०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दिनांक २७ जुलै, २०१८
७. नगर विकास विभाग शासन परिपत्रक क्र. पुरक-२०१८/प्र.क्र.१३८/नवि-४, दिनांक १८ ऑगस्ट, २०१८

__प्रस्तावना:__

पुणे महानगर मेट्रो रेल प्रकल्प टप्पा-१ मधील मार्गिका क्रमांक १ (पिंपरी-चिंचवड ते स्वारगेट- लांबी १६.५८९ कि.मी.) व मार्गिका क्रमांक २ (वनाज ते रामवाडी - लांबी १४.६६५ कि.मी.) या रु.११४२० कोटी किंमतीच्या उन्नत व अंशत: भुयारी मेट्रो प्रकल्पाच्या सुधारीत प्रस्तावास केंद्रीय मंत्रीमंडळाने दिनांक ७ डिसेंबर २०१६ रोजी व राज्य मंत्रीमंडळाने दिनांक ८ डिसेंबर २०१६ रोजी मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने राज्यशासनाने शा. नि. क्र. पीएमआर -३३१६/प्र.क्र.१३२/नवि-७, दि. २३.१२.२०१६ अन्वये शासनाने मान्यता दिली. केंद्र शासनाने क्र K-१४०१/(N-१)/२०१४-MRTS-III दिनांक ९ जानेवारी २०१७ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. केंद्रशासनाने पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पास मान्यता देताना यापूर्वी स्थापन झालेल्या नागपूर मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशनचे ( केंद्र व राज्य शासनाचा संयुक्त उपक्रम) राज्यस्तरीय महाराष्ट्र मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशन अशा केद्र व राज्य शासनाचा ५०:५० संयुक्त सहभाग असलेल्या विशेष हेतू वहन कंपनी (SPV) मध्ये परिवर्तन करण्यास तसेच पुणे महानगर मेट्रो रेल प्रकल्प राबविण्यासाठी "महाराष्ट्र मेट्रो रेल कॉपोरेशन लिमिटेड" या केंद्र व राज्य शासनाचा संयुक्त उपक्रम असलेल्या स्पेशल पर्पज व्हेईकल (एस.पी.व्ही.) कंपनीकडे सोपविण्यास मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पासाठी राज्य शासनाचा समभाग रु. १३१० कोटी तसेच केंद्र शासनाचे कर (५०%) साठी रु. ६४४ कोटी आणि राज्यस्तरीय/स्थानिक करावरील खर्चासाठी रु. ३०२.२० कोटी असे ९४६.२० कोटी राज्य शासनाकडून दुय्यम कर्जसहाय्य हे त्याची व्याजासह परतफेड करण्याची जबाबदारी संबंधीत विशेष हेतू वहन कंपनीची राहील या अटीवर देण्यास मान्यता दिली आहे.

२. पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरिता सन २०१७-१८ या वर्षात रु.३० कोटी इतकी रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. या कंपनीस राज्य शासनाकडून तूर्त स्वरुपात बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरीत करण्यात आले आहे. आता, सन २०१८-१९ या वर्षामध्ये सदर प्रयोजनासाठी मूळ अर्थसंकल्पीय तरतूद रु.३० कोटी व जुलै, २०१८ मध्ये पुरवणी मागणीद्वारे रु.३० कोटी अशी एकूण रु.६० कोटी रुपये तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. उक्त तरतूदीमधून रु.४२ कोटी इतकी रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. या कंपनीस राज्य शासनाकडून दुय्यम कर्ज म्हणून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय -</u>**

१. पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून रु. ४२,००,००,०००/- (अक्षरी रुपये बेचाळीस कोटी फक्त) इतकी रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम "मागणी क्र. एफ-७, ४२१७ नगरविकासावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमांना कर्जे (००) (०८) पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरिता राज्य शासनाचे दुय्यम कर्ज, ५५ कर्ज व आगाऊ रकमा (६२१७०७९७)" या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच उपसचिव, नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. शासन निर्णयातील परिच्छेद -१ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून काढून ती महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यास देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोख शाखेने देयक तयार करुन ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि- ३१ कार्यासनाने करावी.

४. राज्यशासनाकडून दुय्यम कर्जसहाय्य म्हणून वितरीत केलेल्या उपरोक्त रु.४२कोटीचा विनियोग पुणे मेट्रो प्रकल्पासाठी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडला केंद्रीय/राज्यस्तरीय/ स्थानिक करापोटी येणाऱ्या खर्चासाठी करावयाचा आहे.

५. राज्यशासनाकडून दुय्यम कर्जसहाय्य म्हणून वितरीत उपरोक्त रक्कम रु.४२ कोटी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांच्याकडून सदर प्रकल्पासाठी बाहय संस्थेमार्फत घेतलेल्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर वसूल करावयाची आहे.

६. सदर दुय्यम कर्जावरील व्याजाबाबत वित्त विभागाकडे स्वतंत्र प्रस्ताव सादर करुन निर्णय घेण्यात येईल. भविष्यात या कर्जावर व्याज अदा करावयाचे झाल्यास त्याची वसूली महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांच्याकडून करण्यात येईल, या अटीवर महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांना वितरीत करावयाचे दुय्यम कर्ज रु.४२ कोटी हे तुर्त बिनव्याजी कर्ज म्हणून वितरीत करण्यात येत आहे.

७. सदर कर्ज सहाय्याची रक्कम भविष्यात काही व्याज द्यावे लागल्यास त्या व्याजासह प्रकल्पाकरीता घेतलेल्या मुख्य कर्जाची परफेड केल्यानंतर एका हप्त्यात करण्यात यावी.

८. पुणे मेट्रो प्रकल्पाकरिता राज्यशासनाकडून केंद्रीय व राज्यस्तरीय/स्थानिक करापोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त झालेली रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडकडे जमा झाल्याचे प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

९. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशिल पुणे महानगरपालिका/ राज्य शासन /केंद्रशासन यांना सादर करण्यात यावा.

१०. सदर प्रकल्पासाठी केंद्रशासन/ राज्य शासन/पुणे महानगरपालिका/पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांच्या करापोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त होणाऱ्या रक्कमांसाठी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत.

११. राज्यशासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर कर्जसहाय्यासाठी राज्यशासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

१२.  पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पासाठी प्राप्त होणाऱ्या निधीबाबत राज्य शासनाच्या वतीने आयुक्त, पुणे महानगरपालिका यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत व वितरीत झालेल्या निधीचे संनियंत्रण करावे.

१३.  सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी मंजूर केली आहे ती त्याच प्रयोजनासाठी खर्च केल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन यांनी आयुक्त, पुणे महानगरपालिका यांचे मार्फत सादर करावे.

१४.  सदर कर्ज सहाय्याच्या वितरणाबाबत शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी दिनांक ३०/१२/२०१४ मधील सूचनानुसार महाऋण आज्ञावलीत **जोडपत्र-अ** (सोबत जोडले आहे) नुसार माहिती भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

१५.  वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं.२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ मधील परिच्छेद क्र. ७ मधील अटींची व त्यासोबतच्या परिशिष्टातील नमूद केलेल्या बाबींच्या तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

१६.  राज्य शासनाकडून पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरीता आतापर्यंत रु. ३० कोटी इतका निधी दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून वितरीत करण्यात आला आहे. सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालील प्रमाणे :-

| **अनु.क्र.** | **दिनांक** | **रक्कम (रु. कोटी)** | **निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव** | **एकूण वितरीत निधी (रु. कोटी)** |
|---|---|---|---|---|
| १ | २८.०३.२०१८ | ३०.०० | राज्य शासन | ३०.०० |
| ३ | सदरचे वितरण | ४२.०० | राज्य शासन | ७२.०० |

१७.  सदर निधी वितरण आदेश वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ.३२४/व्यय-३ दिनांक २९.११.२०१८ नुसार मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

१८.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०१०११२३९३२४०२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vishnu Shripati Patil

Digitally signed by Vishnu Shripati Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21ebe4508a75a767041512feeaa6b8f2d5bc8caf857fe02cd29ce4bbb772da09, serialNumber=f8a0fc598f692587efafe9bd62df9e449fdf81c803c27adf1782c97c76ebcba5, cn=Vishnu Shripati Patil
Date: 2019.01.04 15:30:08 +05'30'

( वि. श्री. पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३) सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली
४) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे
५) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी.
६) महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे.

७) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. मुंबई
८) महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
९) निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
१०) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
११) अधिदान व लेखाधिकारी मुंबई
१२) वित्त विभाग (व्यय-३), अर्थसंकल्प-१६, अर्थसंकल्प-३.
१३) नियोजन विभाग (कार्यासन १४४४)
१४) उपसचिव न.वि.-५, नगर विकास विभाग मंत्रालय मुंबई
१५) कक्ष अधिकारी नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ .
१६) रोख शाखा (५ प्रती),
१७) निवड नस्ती, नवि-७.

**जोडपत्र-अ**

**महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांना पुणे मेट्रो प्रकल्पाकरीता सन २०१८-१९ मध्ये रु.४२.०० कोटीचे दुय्यम कर्ज सहाय्य वितरीत करण्याबाबत.**

| अ.क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| १. | संस्थेचे नांव | महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., नागपूर (केंद्र व राज्यशासनाचे संयुक्त एसपीव्ही) १०१, आरियन बिल्डिंग, डान बास्कोच्या समोर, युवा केंद्र, कोरेगांव पार्क, पुणे-४०० ००१ |
| २. | वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक | अनौ.३२४/व्यय-३<br>दिनांक २९/११/२०१८ |
| ३. | कर्जाची एकूण मंजूर रक्कम | रु.९४६.२० कोटी |
| ४. | मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम | सन २०१७-१८ रु.३० कोटी |
| ५. | मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम | रु.४२.०० कोटी |
| ६. | एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी | - |
| ७. | एकूण कर्ज परतफेडीचे हप्ते | एका हप्त्यात |
| ८. | कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम | रु.४२.०० कोटी |
| ९. | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक/सहामाही/त्रैमासिक इत्यादी | मुख्य कर्जाची परतफेड सन २०३६ मध्ये झाल्यावर दुय्यम कर्ज सहाय्याची परतफेड सन २०३७ मध्ये सुरू होईल. एका हप्त्यात वसूली होणे अपेक्षित आहे. |
| १०. | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | नाही. |
| ११. | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक | सन २०३७ |
| १२. | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | सन २०३७ |

| | | |
|---|---|---|
| १३. | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | सन २०३७ |
| १४. | व्याज दर | सदर कर्जावर व्याज आकारणी बाबत तुर्तास तरतूद नाही. तथापि, भविष्यात व्याज आकारण्याची वेळ आल्यास वित्त विभागाच्या सहमतीने व्याज वसूली व व्याजाचा दर निश्चित करण्यात येईल. |
| १५. | विलंब कालावधीसाठी दंडनीय व्याजदर व इतर आकार | लागू नाही. |
| १६. | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालावधी जसे वार्षिक/त्रैमासिक/सहामाही इत्यादी | अनुक्रमांक १४ प्रमाणे |
| १७. | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | मागणी क्र. एफ-७, ४२१७ नगर विकासावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमांना कर्जे (००) (०८) पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरिता  राज्य शासनाचे दुय्यम कर्ज, ५५ कर्ज व आगाऊ रकमा  (६२१७०७९७) |
| १८. | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | नवीन लेखाशिर्ष घेण्यात येत आहे. |
| १९. | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | अनुक्रमांक १४ प्रमाणे |
| २०. | कर्जाशी संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | लागू नाही. |
| २१. | शासकिय कंपनीच्या नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | श्री. . जी. डी. कोहले, उप व्यवस्थापक (वित्त), महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि.,मेट्रो हाऊस, २८/२, सी.के.मार्ग, आनंद मार्ग, सिव्हिल लाईन्स, नागपूर-४४० ००१.<br>फोन नं. ०७१२-२५५४२१७ |
| २२. | डी. डी.ओ.चा नंबर | कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>डी. डी.ओ. नंबर- ७१०१००२३०१ |

******